येरवडा मध्यवर्ती कारागृह येथील महिला कारागृहाच्या तटभिंतीची उंची वाढविण्यासाठी येणा-या खर्चास व अंदाजपत्रके व नकाशास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्रमांक : बीएलडी २००४/प्र.क्र.१५१/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक : २१ मार्च, २००५.

वाचा :- कारागृह महानिरीक्षणालयाचे पत्र क्र.बीएलडी/४७९७/३९०६/४२९६/कक्ष-३. दि.१०.६.२००४.

**शासन निर्णय** :-येरवडा मध्यवर्ती कारागृह येथील स्वतंत्र महिला कारागृहाच्या तटभिंतीची उंची वाढविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या संदर्भात असे नमूद करण्यात येते की, येरवडा मध्यवर्ती कारागृह, पुणे येथील स्वतंत्र महिला कारागृहाच्या मुख्य तटभिंतीची उंची ३.५० मीटर असून कारागृहाच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने तटभिंतीची उंची वाढविणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने महिला कारागृहाच्या तटभिंतीची उंची २.५ फूट इतकी वाढविण्याचा निर्णय मा.प्रधान सचिव (तुरुंग) यांच्या अध्यक्षतेखाली दि.९.१.२००४ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आला. सदर खर्चाचा समावेश केंद्र पुरस्कृत कारागृह सुधारणा योजनेच्या सन २००४-०५ च्या आराखड्यात केला आहे. त्या अनुषंगाने उक्त संदर्भाधिन पत्रान्वये कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य यांनी रु.११.७४ लाख खर्चाचे अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केले आहेत.

सदर अंदाजपत्रकाची तपासणी केली ते बरोबर असून या अंदाजपत्रकातील रु.११.७४ लाख इतक्या रकमेस सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दर्शविली आहे.

३. उपरोक्त वस्तुस्थितीत कारागृहाची सुरक्षितता, कामाची निकड व दि.९.१.२००४ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णय विचारात घेता येरवडा मध्यवर्ती कारागृह येथील महिला कारागृहाची तटभिंतीची २.५ फूट इतकी उंची वाढविण्यासाठी येणा-या रु.११,७४,०००/- (रुपये अकरा लाख चौ-याहत्तर हजार फक्त) इतक्या खर्चास व अंदाजपत्रके आणि नकाशास शासन या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देत आहे.

४. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.बी-५, मुख्य लेखाशिर्ष "२०५६, तुरुंग १०१ तुरुंग, केंद्र पुरस्कृत योजना (००) (०९) कारागृह सुधारणा योजना (२०५६-०१८९) योजनेतर/दत्तमत" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११ जुलै, २००१ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उप विभाग पाचच्या परिशिष्टामधील अनु.क्र.१ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

आ.प.परदेशी

( आ. प. परदेशी )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन,गृह विभाग.

प्रत,

कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य, पुणे
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे
कारागृह उपमहानिरीक्षक, पश्चिम विभाग, पुणे.
अधिक्षक, येरवडा मध्यवर्ती कारागृह, पुणे,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग क्र.१, पुणे,
श्री.बी.आर.कांबळे, उप अभियंता, कारागृह महानिरीक्षणालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
अवर सचिव,बीयुडी-१,गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
निवड नस्ती,पीआरएस-२,गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-३२

****